GR-200408041243500 2-1201

केंद्रपुरस्कृत इंदिरा आवास योजनेअंतर्गत मजबूत टिकाऊ घरकुलांच्या बांधकामाकरीता ठरवून देण्यात आलेले निकष आराखडा.



महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन शुद्धीपत्रक क्रमांक इंआयो १०९६/प्र.क्र.७३/जल-१७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: ११.७.१९९७

पहा:- शासन निर्णय क्र. इंआयो १०९६/प्र.क्र.७३/जल-१७,

## शुद्धीपत्रक

शासन निर्णय क्र. इंआयो १०९६/प्र.क्र.७३/जल-१७, दिनांक ३१ ऑक्टोबर, १९९६ मधील पृष्ठ क्र. २ मधील मुद्दा क्र.३-"घरबांधणीत स्वयंसेवी संस्थाचा सहभाग"

हा मुद्दा त्याखालील परिच्छेदासह पूर्णपणे वगळावा. त्याऐवजी खालील दोन मुद्दयांबाबतचे परिच्छेद वाचावेत.

३. लाभार्थ्यांचा सहभाग:- "घराचेबांधकाम अगदी सुरुवातीपासून लाभार्थ्यांनी स्वत: केलेले असले पाहिजे. लाभार्थ्यांनी घराच्या बांधकामासाठी स्वत:ची व्यवस्था करता येईल. तसेच कुशल मजुरांना या कामी लावता येईल, आणि आपल्या कुटुंबालाही या कामी लावता येईल. त्यामुळे खर्चात काटकसर होईल. बांधकामाचा दर्जा चांगला राहील आणि घर ताब्यात घेताना लाभार्थ्यास यामुळे समाधानही मिळेल अशा रितीने घराच्या योग्य बांधकामाची जबाबदारी स्वत: लाभार्थ्यांवर राहील.

या कामाच्या बाबतीत समन्वय ठेवण्याकरीता लाभार्थ्यांची गावपातळीवर एक समिती स्थापन करण्यात आली पाहिजे. आणि इंदिरा आवास योजनेच्या सर्व ~~महत्त्वाच्या~~ बाबींसंबंधात या समितीशी विचारविनिमय करण्यात आला पाहिजे.

४. घरबांधणीत स्वयंसेवी संस्थाचा सहभाग:- "ज्या स्थानिक स्वयंसेवी संस्थेची, चांगले काम केल्याबद्दल नोंद झालेली आहे. अशा योग्य स्थानिक स्वयंसेवी संस्था जेथे जेथे उपलब्ध असतील तेथे इंदिरा आवास योजनेखालील घराचे बांधकाम करण्यासाठी अशा योग्य संस्थेची मदत घ्यावी. अशा स्वयंसेवी संस्थाकडे बांधकामाच्या देखरेखीचे त्याबाबतीतील मार्गदर्शनाचे आणि संनियंत्रणाचे काम सोपविता येईल. विशेषत: स्वयंसेवी संस्थांनी स्वच्छता गृहाच्या वापराबाबत आणि इंधनावरील धूरविरहित चुली बसविण्याकरिता लोकांना प्रवृत्त करावे".

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

२१/७/९७

[ज. स. सावंत]
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.